**सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था यांच्या आस्थापनेवरील अधिकारी/कर्मचारी यांच्या वैद्यकीय खर्च प्रतिपूर्ती देयके मंजूरीकरीता स्थापन केलेल्या समितीस मान्यता देण्याबाबत.................**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - राजस-२०२१/प्र.क्र.१९३/५स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १९ एप्रिल, २०२२

**संदर्भ :-** १. सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.वैखप्र-२०१८/ प्र.क्र.४८८/ २०१८/ राकावि-२, दि.६/६/२०१९

२. सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे का.आ.क्र.लेखा/७.सआ/वै.दे./मंजूरी समिती/२९९/२०२१, दि.१५/३/२०२१

३. सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा.क्र.लेखा/ ७.सआ/वै.दे.मंजूरी समिती/३३८/२०२१, दि.६/४/२०२१

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथे नमूद दि.६/६/२०१९ च्या शासन निर्णयान्वये रु.२.०० लाख ते रु.३.०० लाख पर्यंतची वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीची प्रकरणे मंजूर करण्याचे अधिकार विभागप्रमुखांना देण्यात आले आहेत. त्यानुषंगाने वैद्यकीय खर्च प्रतिपूर्ती देयकांची काटेकोरपणे तपासणी करण्याकरीता संदर्भाधीन क्र.२ येथे नमूद सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या दि.१५/३/२०२१ कार्यालयीन आदेशान्वये समिती गठीत करण्यात आली.

सदर समितीमध्ये उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ यांचा सदस्य म्हणून समावेश करण्यात आला. सदर समितीमधील उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ यांनी सदर समितीस शासन स्तरावरुन (सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई) यांची मान्यता घेण्यात आलेली नाही अथवा शासन निर्णय नाही असे सहकार आयुक्त यांना दि.१७/३/२०२१ अन्वये कळविले होते.

त्यानुषंगाने सहकार आयुक्त यांनी सद्यस्थितीत वैद्यकीय खर्च प्रतिपूर्ती मंजूरी समितीस मंजूरी न मिळाल्याने त्यांच्या कार्यालयात बरीच वैद्यकीय खर्च प्रतिपूर्ती देयके प्रलंबित असल्याची बाब नमूद करुन, वैद्यकीय खर्च प्रतिपूर्ती प्रकरणांच्या मंजूरीसाठी व प्रकरणे निकाली काढण्याकरीता सदर समिती मंजूरीचा प्रस्ताव सार्वजनिक आरोग्य विभागास सादर करण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भाधीन क्र.३ येथे नमूद दि.६/४/२०२१ अन्वये शासनास सादर केला होता. त्यानुषंगाने सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या स्तरावर गठीत केलेल्या समितीस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था यांच्या आस्थापनेवरील अधिकारी/कर्मचारी यांच्या वैद्यकीय खर्च प्रतिपूर्ती देयके मंजूरीकरीता सहकार आयुक्त स्तरावर खालीलप्रमाणे स्थापन केलेल्या समितीस मान्यता देण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १ | सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे | अध्यक्ष |
| २ | अपर निबंधक सहकारी संस्था (पतसंस्था व सर्वसाधारण), महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| ३ | उपसंचालक, आरोग्य सेवा | सदस्य |
| ४ | सहाय्यक संचालक (लेखा), सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे | सचिव |
| ५ | लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |

२. सदर शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२५४/राकावि-२, दि.१/४/२०२२ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२२०४१९११५२१३५२०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्टाचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Pallavi Kishor Kolekar

Digitally signed by Pallavi Kishor Kolekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation, Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ba35d79c9fe547ea6b606f742ced2d6ebfd2c68412e49f5edac040ea7952ed5d, serialNumber=e01062e9c78c4616d627a8cf0a5b109edc1a71f9a6cd0f92b84ddfcfc6c858ac, cn=Pallavi Kishor Kolekar
Date: 2022.04.19 11:54:39 +05'30'

**( पल्लवी कोळेकर )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. मा.मंत्री (सहकार व पणन) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव
४. अवर सचिव (राकावि-२), सार्वजनिक आरोग्य विभाग, गो.ते.रुग्णालय संकुल इमारत, मुंबई-१
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे.
६. मा.अपर मुख्य सचिव (सहकार व पणन) यांचे स्वीय सहाय्यक
७. निवडनस्ती- कार्यासन-५स.